**शिवछत्रपती क्रीडापीठ बालेवाडी, पुणे व क्रीडा प्रबोधिनी, पुणे येथील रोजंदारी/ मानधनावरील कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेत समाविष्ठ करून घेण्यासाठी पुर्वलक्षी प्रभावाने पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : क्रीडाप्र-२००७/प्र.क्र.४४/क्रीयुसे-२,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२

दिनांक: २१ जानेवारी, २०२२

<u>संदर्भ</u>:- (१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक-क्रीडाप-२००७/प्र.क्र.४४/क्रीयुसे-२, दिनांक १८ जुलै,२०१३.

(२) मा.औद्योगिक न्यायालयात दाखल केलेल्या युएलपी क्रमांक २८/२०१४ मध्ये मा.औद्योगिक न्यायालयाने दिनांक २६ फ़ेब्रुवारी,२०१४ रोजी दिलेला निर्णय

(३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांचे पत्र क्र. शिक्रीपी/पदे/प्रस्ताव/१३-१४/का-१, दि.०१ मार्च,२०१९

(४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक-क्रीडाप-२००७/प्र.क्र.४४/क्रीयुसे-२, दिनांक- ३० डिसेंबर,२०२०

(५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांचे पत्र क्र. आस्थाप/पदे निरसीत/२०२०/का-१, दि.०३ जून,२०२१

(६) शासन पत्र, वित्त विभाग, क्रमांक- पदनि २०२१/प्र.क्र.६२/आपुक, दि.२२.१२.२०२१

(७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक-क्रीडाप-२००७/प्र.क्र.४४/क्रीयुसे-२, दिनांक- २१ जानेवारी,२०२१

<u>प्रस्तावना</u>:-

शासनाने संदर्भाधीन क्र.१ येथील, दिनांक १८ जुलै,२०१३ च्या शासन निर्णयान्वये मानधन तत्त्वावरील ५८ पदे पूर्वलक्षी प्रभावाने शासन सेवेत कायम करण्यास मान्यता दिली आहे. सदर कर्मचारी शासन सेवेत पूर्वलक्षी प्रभावाने नियुक्त होण्यापूर्वी ते ज्या पदावर कार्यरत होते त्याच पदावर त्यांना पदस्थापना देण्यासंदर्भात मा.औद्योगिक न्यायालय,पुणे यांनी संदर्भाधीन क्र.४ येथील दि. २६.०२.२०१४ च्या आदेशान्वये, आदेशीत केले आहे. मा.औद्योगिक न्यायालयाने दिलेल्या आदेशाचे अनुपालन करण्यासाठी, संदर्भाधीन क्र.४ येथील दि.३० डिसेंबर,२०२० च्या शासन निर्णयान्वये, क्रीडा व युवकसेवा संचालनालयाच्या नियमीत आस्थापनेवरील ०३ पदे निरसीत करण्यात आली आहेत. तथापि, संदर्भाधीन क्र.७ येथील दि.२१ जानेवारी,२०२१ च्या शासन निर्णयान्वये, सदरची व्यपगत करण्यात आलेली ३ पदे पुनरुज्जिवीत करण्यात आली आहेत. त्याअनुषंगाने संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१८ जुलै,२०१३ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नमूद ३ कर्मचाऱ्यांसाठी ३ पदे निर्माण करणे व सदर कर्मचाऱ्यांची पदनामे सुधारीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शिवछत्रपती क्रीडापीठ बालेवाडी, पुणे व क्रीडा प्रबोधिनी, पुणे येथील रोजंदारी/ मानधनावरील कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेत समाविष्ठ करुन घेण्यासाठी पुर्वलक्षी प्रभावाने पदे निर्माण करण्यासंदर्भातील संदर्भाधीन क्र.४ येथील दिनांक ३०.१२.२०२० चा शासन निर्णय अधिक्रमीत करण्यात येत आहे.

२. संदर्भाधीन क्र.१ येथील दि. १८ जुलै,२०१३ च्या शासन निर्णयान्वये, शिवछत्रपती क्रीडापीठ बालेवाडी, पुणे व क्रीडा प्रबोधिनी, पुणे येथील मानधन व रोजंदारी तत्वावर कार्यरत असलेल्या ५८ कर्मचाऱ्यांना पुर्वलक्षी प्रभावाने दि.०८.०९.२००१ पासून शासन सेवेत कायम करण्यासाठी मान्यता दिली आहे. सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये ५८ कर्मचाऱ्यांची यादी दिली आहे. सदर परिशिष्ठ-अ मध्ये नमूद खालील ३ कर्मचाऱ्यांसाठी रकाना क्र.४ नुसार, त्यांच्या नावासमोर नमूद केलेली अधिसंख्य पदे दि.०८.०९.२००१ पासून निर्माण करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | दि. १८ जुलै,२०१३ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-अ मधील नमूद पदनाम | दि.०८.०९.२००१ पासून निर्माण करावयाच्या अधिसंख्य पदाचे पदनाम | दि.०८.०९.२००१ पासून निर्माण करावयाच्या अधिसंख्य पदाची वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | कु. शिल्पा सिताराम वारुळे | कनिष्ठ लिपीक | लघुटंकलेखक | रु.५२००-२०२००+ ग्रेड वेतन २४००/- |
| २ | श्री. प्रसाद कजबजे | मजूर | जीवरक्षक | रु.५२००-२०२००+ ग्रेड वेतन २०००/- |
| ३ | श्री. दत्तात्रय आण्णासो गायकवाड | मजूर | वीजतंत्री | रु.५२००-२०२००+ ग्रेड वेतन २४००/- |

३. उपरोक्त प्रमाणे अधिसंख्य पदांची निर्मिती केल्यानंतर, वरील तक्त्यातील रकाना क्रमांक ३ मधील पदे आपोआप निरसीत होतील. उपरोक्त अधिसंख्य पदे संबंधीत कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्ती/मृत्यु/ राजीनामा यापैकी जे आगोदर घडेल त्या दिनांकापर्यंत राहतील व त्यानंतर ती आपोआप व्यपगत होतील.

४. उपरोक्त नमूद जीवरक्षक व वीजतंत्री पदाचे सेवा प्रवेश नियम विहीत करणे व सदर पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या निश्चीत करण्याची कार्यवाही स्वतंत्ररित्या करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५२५/व्यय-५, दि.०९.११.२०२० व क्र. २७८/२०/आ.पु.क.,दि.१६.१०.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेच्या व शासन पत्र, वित्त विभाग, क्रमांक- पदनि २०२१/प्र.क्र.६२/आपुक, दि.२२.१२.२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमीत करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२११५३३२२५८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2022.01.21 15:34:49 +05'30'

**( स्वाती नानल )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

(१) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
(२) संबंधीत विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत)
(३) संबंधीत कर्मचारी (संचालनालयामार्फ़त)
(३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १ व २, मुंबई/नागपूर,
(४) महालेखापाल,(लेखा परीक्षा) महाराष्ट्र, १ व २, मुंबई/नागपूर,
(५) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी (संचालनालयामार्फत)
(६) अपर मुख्य सचिव,वित्त विभाग,मंत्रालय, यांचे स्वीय सहायक
(७) निवड नस्ती (क्रीयुसे-२).